प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (अनुसूचित जमाती उपयोजना) अंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये सन २०२०-२१ व २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिताच्या उद्दिष्टांकरिता राज्य शासनाचा समरुप हिस्सा रु.१५०६०.६६७ लाख या अनुज्ञेय हिश्श्यापैकी ऊर्वरित निधी रू. १२६५५.८०७ लाख वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांक:** प्रआयो-२०२२/प्र.क्र.१११/योजना-१०
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २३ फेब्रुवारी, २०२३

वाचा :-

१) उप सचिव (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/१/२०२०-RH-Acct.-५, दि.३०.०९.२०२२ रोजीचे आदेश.

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. राव्यक-ग्रागृ/लेखा (प्रआयो)/ 1st installment/अनु.जमाती/२०२२/१९४९, दि.०३.१०.२०२२.

३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. पूरक-२०२२/प्र.क्र.९६/अर्थ-३, दि.२३.१२.२०२२

४) ग्रामविकास विभागाचा शासन निर्णय क्र. प्रआयो-२०२२/प्र.क्र.१३५/योजना-१०, दि.१८.०१.२०२३

५) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.०८/कार्यासन ६, दि.२१.०२.२०२३

शासन निर्णय :-

प्रधानमंत्री आवास योजना ( ग्रामीण) अनुसूचित जमाती (TSP) उपयोजना घटकांतर्गत सन २०२२-२३ या वर्षामध्ये सन २०२०-२१ व २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिताच्या उद्दिष्टांकरिता केंद्र शासनाचा हिस्सा रू. २२५९१.००० लाख एवढा निधी वितरित केला आहे. सदर निधीस रू.१५०६०.६६७ लाख एवढा राज्य समरुप हिस्सा अनुज्ञेय आहे. मात्र लेखाशिर्ष २५०५ ए१३८ राज्य

हिस्सा अंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये रु.२४०४.८६० लाख एवढा निधी उपलब्ध असल्याने , सदर निधी वितरणाबाबतचा संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. उपरोक्त वित्त विभागाचे संदर्भाधीन क्र.३ येथील शासन परिपत्रक , दिनांक २३.१२.२०२२ अन्वये पुरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून सदर राज्य हिश्श्यापैकी ऊर्वरित रक्कम रु. १२६५५.८०७ लाख इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२२-२३ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. राज्य हिश्श्याचा निधी मागणी क्र. टी-५ २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१)(०६) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य (२५०५ ए१३८) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तुत निधीबाबत उप संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण -गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. अन्यथा शासन स्तरावरुन कारवाई केली जाईल.

६. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ५४/का.६, दि.१५.०२.२०२३ तसेच, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ९६/व्यय-१४ , दि. ०८.०२.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२३१६५१५३९४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manoj Dattatraya Jadhav

Digitally signed by Manoj Dattatraya Jadhav
DN: cn=Manoj Dattatraya Jadhav, o=Rural Development Department, ou=Central Scheme, email=manoj.jadhav68@nic.in, c=IN
Date: 2023.02.23 18:34:01 +05'30'

(मनोज जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)
२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, ४ था मजला दक्षिण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर.
५) आदिवासी विकास विभाग (कार्यासन -६, ८ व १७), मंत्रालय, मुंबई -३२.
६) वित्त विभाग (व्यय-१४ व १५) व (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-३२.
७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, व निवड नस्ती योजना-१०.